माजी सैनिकांना शासकीय सेवेत सामावून देण्याबाबत भारत सरकारच्या कार्यकारी गटाने केलेल्या शिफारशींची अंमलबजावणी करण्याबाबत -

समन्वय आणि सनियंत्रण कक्ष स्थापन करण्याबाबत -

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक आरटीए-१०८१/४१२०/१४८९/सीआर-४१/१६-अ
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक १४ एप्रिल १९८२.

वाचा :- [१] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक आयपीई-१०८०/१८१/१६-अ, दिनांक १० ऑक्टोबर, १९८०

[२] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०८०/५६३/१५६/१६-अ, दिनांक १ डिसेंबर, १९८०

[३] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक आरटीए-१०७९/४८२/१६-अ, दिनांक १६ एप्रिल, १९८१.

परिपत्रक :- शासनाने माजी सैनिकांना वर्ग-३ व वर्ग-४ मधील पदांवर नियुक्ती देण्यासाठी प्रत्येकी १५ टक्के पदे राखून ठेवली आहेत आणि कमाल वयोमर्यादा, शैक्षणिक पात्रता इ. बाबत वेळोवेळी आदेश काढून सवलती दिल्या आहेत. याबाबतच्या आदेशांची सर्व विभागप्रमुख व कार्यालयप्रमुख योग्य प्रकारे अंमलबजावणी करतील व राखीव पदांवर माजी सैनिकांना सामावून घेतले जाईल हे पाहण्यासाठी शासनाने सामान्य प्रशासन विभागामध्ये एक समन्वय व सनियंत्रण कक्ष स्थापन करण्याचे ठरविले आहे. या कक्षामध्ये खालीलप्रमाणे अधिकारी व कर्मचारी राहतील :-

| | |
|---|---|
| सहायक सचिव | १ |
| सहायक | १ |
| लिपिक | १ |

हा कक्ष माजी सैनिकांच्या पुनर्वसनासाठी शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशांच्या अंमलबजावणीबाबत समन्वय व सनियंत्रणाचे कार्य करील व विविध विभागांकडून यासंबंधी माहिती जमा करून शासनास सादर करील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श.मा.उंडे,
शासनाचे उप सचिव

कृ.मा.प.

शामसु.रोटा/साप्रवि./एफ-१६५(५५००-४-८२).

प्रत

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री/उपमंत्री यांचे स्वीय सहायक,
* प्रोथोनटरी व सिनियर मास्टर, हायकोर्ट, मुंबई
* निबंधक, हायकोर्ट, अपिलेट साईड, मुंबई,
* निबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/
कार्यालयप्रमुख,
इतर सर्व मंत्रालयीन विभाग

* पत्राने.

------

एच-१६५[४५००-४-८२].